**शासनाच्या विविध प्रकल्पांसाठी आदिवासी खातेदारांच्या जमिनी संपादित करताना जमिनीच्या किंमतीच्या १० टक्के अनर्जित रक्कम कपात करण्याबाबतची तरतूद रद्द करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- जमीन-२०२४/प्र.क्र.१४२/ज-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०३ एप्रिल, २०२५.

**वाचा:-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आदिवासी-३१०९/११८०/प्र.क्र.१०६/ल-९, दि.१५ जुलै, २०१०.
२) मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट पिटीशन क्र. ३५४४, ३५४५/२०२० तसेच, ९४५३५/२०२० प्रकरणी मा. न्यायालयाचे दि. १३.०४.२०२२ रोजीचे आदेश.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम ३६ व ३६-अ अन्वये आदिवासी खातेदारांच्या जमिनीच्या हस्तांतरणास निर्बंध आहेत. तथापि, कलम ३६-अ नुसार आदिवासी खातेदारांच्या जमिनी बिगर आदिवासी खातेदारास हस्तांतरण करण्यास शासन स्तरावरून परवानगी देण्यात येते. त्यानुषंगाने, संदर्भिय क्र. १ च्या दि. १५.०७.२०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये, आदिवासी खातेदारांच्या जमिनी शासनाच्या प्रकल्पासाठी भूसंपादन करताना/संबंधित शासकीय विभागास हस्तांतरीत करताना जमिनीच्या प्रचलित बाजारमूल्याच्या १० टक्के इतकी अनर्जित रक्कम वा नजराणा रक्कम वसूल करण्याचे धोरण निश्चित करण्यात आलेले आहे.

तथापि, सदर दि. १५.०७.२०१० रोजीच्या शासन निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट पिटीशन क्र. ३५४४, ३५४५/२०२० तसेच, ९४५३५/२०२० प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने दि.१३.०४.२०२२ रोजीच्या आदेशान्वये आदिवासी खातेदारांच्या जमिनी शासनाच्या प्रकल्पासाठी ऐच्छिक स्वरुपाने संपादित केल्या जात नसून सक्तीने संपादित केल्या जात असल्याने भारतीय राज्यघटनेच्या कलम १४ चे उल्लंघन होत असल्याचे नमूद करून संदर्भिय क्र.१ येथील दि.१५.०७.२०१० रोजीचा शासन निर्णय रद्द ठरविला आहे. परंतु, शासन निर्णय, दि. १५.०७.२०१० अन्वये शासनाच्या विविध प्रकल्पांसाठी आदिवासी खातेदारांच्या जमिनी महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम ३६ व ३६-अ अन्वये खरेदीने / वाटाघाटीने संपादनाची परवानगी देताना नजराणा म्हणून १०% रक्कम कपात करण्याव्यतिरिक्त शासकीय प्रकल्पासाठी आदिवासी खातेदारांच्या जमिनी संपादित करण्याच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी व तहसिलदार यांना इतर काही सूचनाही देण्यात आलेल्या आहेत. सदर शासन निर्णय रद्द केल्यास त्याही सूचना आपोआप व्यपगत होतील. त्यामुळे क्षेत्रिय कार्यालयास संबंधित प्रकरणांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यास अडचणीचे ठरू शकते.

**०२.** यास्तव, महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.आदिवासी-३१०९/११८०/प्र.क्र.१०६/ल-९, दि. १५.०७.२०१० मधील शासनाच्या विविध प्रकल्पांसाठी आदिवासी खातेदारांच्या जमिनी महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम, १९६६ चे कलम ३६ व ३६-अ अन्वये खरेदीने / वाटाघाटीने संपादनाची परवानगी देताना नजराणा म्हणून १०% रक्कम कपात करण्याबाबतची तरतूद रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या विविध प्रकल्पांसाठी आदिवासी खातेदारांच्या जमिनींचे भूसंपादन करताना/संबंधित शासकीय विभागास हस्तांतरीत करताना जमिनीच्या प्रचलित बाजारमूल्याच्या १० टक्के इतकी अनर्जित रक्कम वा नजराणा रक्कम वसूल करण्याबाबत महसूल व वन विभाग, शासन निर्णय दि. १५.०७.२०१० अन्वये निश्चित करण्यात आलेली तरतूद या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे. तथापि, याव्यतिरिक्त सदर शासन निर्णयानुसाार याप्रकरणी जिल्हाधिकारी व तहसिलदार यांना देण्यात आलेल्या सूचना कायम राहतील.

सदर शासन निर्णय, विधी व न्याय विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २२४/२०२४/Civil/Confl.६४८/ A Branch दि. २५.१०.२०२४ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८२/साधनसंपत्ती दि.०१ जानेवारी, २०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४०३१८१९५९१९१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MOHASIN RAJMAHMAD SHAIKH

Digitally signed by MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=613d5f4e81161c3485310241b06dd6ce7372ad8baf95f5ae576d53ac61afe62b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=74CDE6704F3FD0A42314F2424B55F3CFA18AE8A657DC2FC61B51901A90B029D5, cn=MOHASIN RAJMAHMAD SHAIKH
Date: 2025.04.03 18:21:15 +05'30'

**(मोहसिन रा. शेख)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त), यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

११) अपर मुख्य सचिव, (महसूल, मुद्राक शुल्क व नोंदणी), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२ , मुंबई/ नागपूर.
१३) महालेखापाल(लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२ , मुंबई/ नागपूर.
१४) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे.
१५)नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६)महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१७) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१८)उप सचिव (ज-१), यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) सर्व विभागीय आयुक्त.
२०) सर्व जिल्हाधिकारी.
२१) सर्व विशेष भूसंपादन अधिकारी/सर्व सक्षम भूसंपादन अधिकारी अथवा उपविभागीय अधिकारी.
२२) निवड नस्ती (ज-१)